# हेरॉल्डची अंतराळ सफर

लेखक: क्रॉकेट जॉन्सन.



मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



एकदा रात्री हेरॉल्ड उठला. चंद्र आभाळात आहे, याची त्याने खात्री करून घेतली. कारण त्याला अंधाराचं भय वाटे. मग तो पाणी प्यायला गेला.



लोक अंधारातही काही गोष्टी बघू शकतात, हे पाहून त्याला नवल वाटे. या गोष्टी येतात तरी कुठून, हा प्रश्न त्याला पडे. चंद्रप्रकाशात त्या गोष्टी दिसत नाहीत, याचं त्याला बरं वाटे.



अचानक त्याला जाणवलं की चंद्रप्रकाशात तो काहीही बघू शकत नाहीये. तिथे बघण्यासारखी गोष्टच नव्हती. तो एका वाळवंटाच्या मध्यभागी उभा होता.



साहजिकच, त्याला खूप तहान लागली.
सुदैवाने, त्याने आपला जांभळा क्रेयॉन
सोबत आणला होता.



वाळवंटात पाणी कुठे सापडतं, हे त्याला ठाऊक होतं.



ताडाच्या झाडानजिक नेहमी
पाण्याचं डबकं असतं.



हेरॉल्ड पोटभर पाणी प्याला. वाळवंटात
थंडगार पाणी पिण्यासारखं दुसरं सुख नाही.





हेरॉल्डने सभोवताली नजर टाकली. या वाळवंटात वाळूत खेळण्याव्यतिरिक्त आणखी काही करता येणार नाही, हे त्याला उमगलं.

त्यांचं सरकार वाळवंटात काय गंमतीजमती करतं, ते त्याला आठवलं. ते इथूनच अंतराळात रॉकेट पाठवतात.



चंद्रावर जाऊ, असं हेरॉल्डने मनाशी ठरवलं.



एका छानशा वेगवान रॉकेटमधून गेलं की नाश्त्याच्या वेळेपर्यंत आपण परतू, असं त्याला वाटलं.



त्याने आपल्या रॉकेटची वात
पेटवली.



आणि तो आभाळात उंच उडाला.



पण रॉकेट चंद्रापासून मैलभर दूर
अंतरावरून उडत सरळ वर गेलं.



रॉकेट अधिकाधिक वर काळ्या गर्द काळोखात
जाऊ लागलं.



ताऱ्यांच्या स्थितीवरून आपण कुठे जात आहोत,
याचा अंदाज बांधण्याचा प्रयत्न हेरॉल्डने केला.



पण रस्ता दिसण्यासाठी त्याला एका
चंद्राची आवश्यकता वाटत होती.



त्याने सर्वत्र बारकाईने न्याहाळलं, तरी त्याला चंद्र कुठेच दिसेना. एक उडती तबकडी दिसल्यावर मात्र त्याला आश्चर्य वाटलं.



हेरॉल्डने उडत्या तबकड्यांबद्दल ऐकलं होतं. काळोखात काही लोकांना त्या दिसत असत. त्यांच्या आत कोण आहे, त्यांना कोण उडवतं हे कुणालाच माहीत नव्हतं.



मग त्याने आपलं रॉकेट उतरवायचं ठरवलं.



रॉकेट एका विचित्र ग्रहाच्या भूमीवर एक धक्का खाऊन उतरलं.



एवढ्या मोठ्या ग्रहावरून पडण्याची भीती नव्हती.



पण आणखी वर उतरलो असतो तर बरं झालं असतं, असं हेरॉल्डला वाटलं.



आपण कोणत्या ग्रहावर आहोत,
याचं त्याला कोडं पडलं.



ताऱ्यांच्या प्रकाशात तो काही खूण, चिन्ह
दिसतात का, ते पाहू लागला.







तो मंगळ ग्रहावर होता.

हेरॉल्डने मंगळावरील लोकांबाबत ऐकलं होतं. कुणीतरी ऐकेल या आशेने तो मोठमोठ्याने "हॅलो" म्हणून ओरडू लागला.





त्याच्या डोक्यात उडत्या तबकडीचा, लोक काळोखात पाहू शकतात, अशा गोष्टींचा विचार आला. आता त्याला कुणाच्यातरी सोबतीची गरज वाटू लागली.

त्याला विश्वास होता की मंगळावरचा मनुष्य त्याच्याशी प्रेमाने वागेल. कारण हेरॉल्ड त्याच्याशी गप्पा मारायला खूप दूरवरून आला होता.



त्याने आपल्या तुटपुंज्या ज्ञानाच्या जोरावर डोक्याला ताण देऊन विचार केला, मंगळावरील मनुष्य कसा दिसत असेल?



पण अंधारात तो कसा दिसत असेल, या गोष्टीने काही फरक पडत नव्हता. त्यामुळे मग हेरॉल्डने तो कसा दिसत असेल, या गोष्टीची पर्वा केली नाही.





हेरॉल्डला फक्त एवढंच जाणून घ्यायचं होतं की त्याच्या आजुबाजूला कुणी मित्रत्वाने वागणारं असावं, भले तो काळोखात स्पष्ट दिसो वा ना दिसो.

मग अचानक त्याला एक स्पष्ट आकृती दिसली. तो कशाचातरी चेहरा होता.



लोक काळोखात बघतात, अशी आकृती होती ती.
ती उडत्या तबकडीत बसली होती.

हेरॉल्ड तिथून पळून गेला.



मग त्याने थांबून विचार केला. कदाचित ही
आकृती उडत पृथ्वीवर जाईल आणि तिथे
कुणा लहान मुलाला ती घाबरवेल.



धैर्य एकवटून हेरॉल्ड परतला.





आपली चाहूल लागू नये म्हणून तो दबक्या पावलाने तबकडीजवळ पोहोचला. त्याने आपला जांभळा खडू उचलला.

त्याने उडत्या तबकडीला नष्ट करण्यासाठी त्यात एक भेग तयार केली.



ती आकृती हेरॉल्डला पकडणार
त्याआधीच तो विजयाच्या उन्मादात
हसत हसत तिथून पळाला.

काळोखात शक्य तितक्या वेगाने तो धावू लागला.





सुदैवाने, बराचसा रस्ता
टेकडीच्या उताराचा होता.

धावता धावता आपण पडणार
नाही, याची त्याने काळजी
घेतली.



तो मंगळ ग्रहाच्या खाली सुरक्षितपणे
पोहोचला. तिथेच त्याचं रॉकेट उभं होतं.

तोवर हेरॉल्डने बऱ्याच साहसी कारवाया
केल्या होत्या. आता त्याला एखाद्या
विश्वासार्ह रितीने घरी पोहोचायचं होतं.



म्हणून तो ताऱ्यांवरून खाली उतरू लागला.



त्याचा वेग कमी होता, पण तो सुरक्षित होता.
ताऱ्यांची टोकं त्याच्या पायाला टोचू लागली.
पण हेरॉल्डला घरची ओढ लागली होती.



एका मोठ्या उल्केवर बसून गेलो तर लवकर
घरी पोहोचू, असं त्याला वाटलं.



पुढच्याच क्षणी, त्याने एका
उल्केवर उडी घेतली.



मग त्याने थेट पृथ्वीकडे झेप घेतली आणि तो पृथ्वीवर उतरला.



वाटेत त्याला चंद्र दिसला नाही. चंद्र कुठे गेला? त्याला आश्चर्य वाटलं. अवतीभवती कुठेच चंद्र दिसत नव्हता.



मग त्याला उमगलं की रात्र सरत आहे आणि सूर्योदय होत आहे. त्याला भूक लागली.



सूर्य अचूक वेळेला उगवला.





सूर्याचं बिंब मोठं आणि प्रखर
दिसत होतं. आजचा दिवस छान
आहे, असं हेरॉल्डला वाटू लागलं.

दिवसाच्या प्रखर उजेडात उडत्या तबकड्या
लोकांना त्रास देत नाहीत.





पण एका अवचित क्षणी, आपल्याला एक उडती तबकडी दिसली, असं हेरॉल्डला वाटलं. ती क्षितिजावर होती. असं वाटलं की ती आता जमिनीवर उतरणार आहे.

पण त्याचा गैरसमज झाला होता. ती काही तबकडी नव्हती. तो खिचडीचा वाडगा होता.





हेरॉल्डला गरम-गरम नाश्ता आवडत असे.

त्याने लगेच आपली खुर्ची ओढून घेतली.



आणि तो नाश्ता करायला बसला.

समाप्त